आदिवासी क्षेत्र उपयोजना /आदिवासी क्षेत्राबाहेरील उपयोजना
२०१०-२०११ चे जिल्हानिहाय व योजनानिहाय अर्थसंकल्पीय
तरतुदीचे वाटप **"मागासवर्गीयांचे कल्याण"**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन शुध्दीपत्रक क्र.बीयुडी-२०१०/प्र.क्र.८/का.६**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक :- ०२ फेब्रुवारी,२०११.**

**वाचा:** १) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.बीयुडी-२०१०/प्र.क्र.८/का.६, दि.१३ मे, २०१०
२) शासन पत्र क्र.वहका २०१०/प्र.क्र.१६४/का.१४, दि.२२.१.२०१० चे कार्यालयीन आदेश.
३)आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे कार्यालयाचे क्र.आसंप्रसं/वनका/का-७/४१, दि.१३.१.२०११ चे पत्र

**शासन शुध्दीपत्रक :-** उपरोक्त क्र.२ च्या शासन पत्रान्वये अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी (वन हक्काची मान्यता) अधिनियम, २००६ व नियम २००८ ची प्रभावीरित्या अंमलबजावणी करण्यासाठी नोडल ऑफीसर म्हणून आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांच्या ऐवजी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांची नियुक्ती करण्यात आली. विषयांकित कायद्याच्या अंमलबजावणी संदर्भात क्र.१ च्या शासन निर्णयान्वये लेखाशिर्ष २२२५ ४११३ खाली रु.६९,९८,१६७/- इतकी तरतूद खर्च झालेली आहे. उर्वरित रु.९,२८,२६,१५३/- एवढी तरतूद या शासन शुध्दीपत्रकान्वये आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांच्या अधिनस्त ठेवण्यात येत आहे. त्यानुसार योजनेचे नांव- योजनांची विविध माध्यमामार्फत माहिती व प्रसिध्दी" साठी रकाना क्र.५ मध्ये दर्शविलेले नियंत्रण अधिकारी दिनांक २ फेब्रुवारी, २०११ पासून आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांच्या ऐवजी आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक असे वाचण्यात यावेत.

२. सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा **संगणक सांकेतांक क्र.२०११०२०२२२०२२९००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( सु. द. नाईक )**
**कार्यासन अधिकारी**

**प्रति.**
आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास,
सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर. (प्रत्येकी २ प्रती)
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
कार्यासन अधिकारी का.क्र.२, व १४ आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई.
ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
निवड नस्ती (का-६)

C:\Documents and Settings\sati2302\Desktop\C R 8 (shudhipatrak) OF 2010.lwp